राष्ट्रीय शाश्वत शेती अभियान (NMSA) सन २०१५-१६ अतंर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) घटक राज्यात राबविण्यासाठी रु.१५.०० कोटी निधीच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**

**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः शाशेअ -२०१५/प्र.क्र.३२७/४अे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२

तारीख: ८ सप्टेंबर, २०१५

**वाचा**

१) केंद्र शासनाने www.agricoops.nic.in या सांकेतिक स्थळावर निर्गमित केलेल्या राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचना

२) शासन निर्णय क्रमांकः शाशेअ-२०१५/प्र.क्र.३२७/४अे, दिनांक ५ सप्टेंबर, २०१५.

३) केंद्र शासनाचे पत्र क्र. १-७/२०१४-RFS-III दिनांक ५ ऑगस्ट, २०१५

४) वित्त विभागाचे परिपत्रक क्रमांक अर्थस-२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३, दिनांक १७ एप्रिल, २०१५.

**प्रस्तावना**

सन २०१४-१५ पासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (RAD) घटक राबविण्यात येत आहे. सन २०१४-१५ मध्ये सदर घटकासाठी केंद्र शासनाचे १००% अनुदान होते. सन २०१५-१६ पासून केंद्र शासनाने सदर घटकासाठी केंद्र व राज्य हिश्श्याचे प्रमाण ५०:५० राहील, असे कळविले आहे. त्यानुसार सन २०१५-१६ या वर्षासाठी केंद्र हिश्श्यापोटी रु.३०.२४ कोटी व राज्य हिश्श्यापोटी रु.३०.२४ कोटी असा एकूण रु. ६०.४८ कोटी रकमेच्या कार्यक्रमास मान्यता कळविलेली आहे. केंद्र शासनाच्या मान्यतेनुसार सदर कार्यक्रम सन २०१५-१६ मध्ये राबविण्यासाठी संदर्भाधीन अ.क्र.२ येथील दि. ५ सप्टेंबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये राज्य शासनाची प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने दि. ५ ऑगस्ट २०१५ च्या पत्रान्वये केंद्र हिश्श्यापोटी सर्वसाधारण प्रवर्गासाठी रु.११.८२ कोटी, अनुसूचित जातीसाठी रु.१.७७ कोटी व अनुसूचित जमातीसाठी रु.१.४१ कोटी असा एकूण रु.१५.०० कोटी एवढा निधी वितरित केलेला आहे. वित्त विभागाने संदर्भाधीन अ.क्र.४ येथील परीपत्रकान्वये मंजूर तरतूदीच्या ७०% एवढी तरतूद वितरीत करण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास दिलेले आहेत. केंद्र हिश्श्यापोटी सन २०१५-१६ या वर्षासाठी रु.१५.०० कोटी एवढी मूळ तरतूद आहे.

वित्त विभागाने प्रदान केलेल्या अधिकारानुसार केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या रु.१५.०० कोटी तरतूदीपैकी रु.१०.५० कोटी एवढी तरतूद वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत अवर्षण प्रवण क्षेत्र विकास (RAD) हा घटक सन २०१५-१६ मध्ये राज्यात राबविण्यासाठी केंद्र शासनाकडून पहिल्या हप्त्यापोटी प्राप्त निधी रु.१५.०० कोटी (अक्षरी रु.पंधरा कोटी फक्त) प्राप्त निधीपैकी रु.१०.५० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लाख फक्त ) एवढ्या रकमेच्या कार्यक्रमास वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधीचे वाटप संवर्गनिहाय वितरण खालीलप्रमाणे राहीलः-

(रुपये कोटीत)

| अ.क्र. | संवर्ग | केंद्र हिस्सा |
|---|---|---|
| १ | सर्वसाधारण | ८.२६ |
| २ | अनुसूचित जाती | १.२४ |
| ३ | अनुसूचित जमाती | १.०० |
| **एकुण** | | **१०.५०** |

३. सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला रु.१०.५० कोटी (अक्षरी रुपये दहा कोटी पन्नास लाख फक्त) एवढा निधी खालील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व सन २०१५-१६ च्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

**लेखाशिर्ष: मागणी क्र. D-३**

**२४०१,पिक संवर्धन,**

**१०९, विस्तार व प्रशिक्षण**

**०१- माहिती व प्रसारण**

**(०१)(५१)- अवर्षण प्रवण क्षेत्र विकास कार्यक्रम (केंद्र हिस्सा)**

**(२४०१ ९५५४) ३३, अर्थसहाय्य**

४. सदर निधीचा विनियोग करताना संदर्भाधीन अ.क्र.१ येथील राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानाच्या मार्गदर्शक सूचना तसेच संदर्भाधीन अ.क्र.२ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती व केंद्र शासनाच्या संदर्भाधीन अ.क्र.३ येथील पत्रातील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

५. सदर योजनेच्या वार्षिक खर्चाचे लेखापरीक्षण करून सदरचा अहवाल व उपयोगिता प्रमाण पत्र केंद्र शासनास पुढील वर्षाच्या जून अखेर पर्यंत पाठविण्यात यावे.

६. या योजनेचा आर्थिक व भौतिक मासिक प्रगती अहवाल त्या पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यंत केंद्र शासनाला व राज्य शासनाला सादर होईल, याची दक्षता घ्यावी.

७. मंजूर निधीचे जिल्हानिहाय वितरण करण्यास तसेच खर्चावर नियंत्रण ठेवण्यासाठी कृषि संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना राज्य नियंत्रक म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच सदर योजनेंतर्गत मंजूर केलेला निधी आहरीत व संवितरीत करण्याचे अधिकार कृषि आयुक्तालय स्तरावर सहाय्यक संचालक, लेखा-१, विभागीय कृषि सहसंचालक कार्यालयातील लेखा अधिकारी, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी कार्यालयातील लेखा अधिकारी, उपविभागीय कृषि अधिकारी व तालुका कृषि अधिकारी यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे संदर्भाधीन अनु.क्र.४ येथील परिपत्रकान्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०९०८१७४१०२१००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sugriv Sambhaji Dhapate

Digitally signed by Sugriv Sambhaji Dhapate
DN: c=IN, o=Govt Of Maharashtra, ou=Housing Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sugriv Sambhaji Dhapate
Date: 2015.09.08 17:48:13 +05'30'

**( सु.सं.धपाटे )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. आयुक्त (कृषि),कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे (१० प्रती)
२. संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे.
३. मा.अ.मु.स. (कृषि) यांचे स्विय सहाय्यक
४. प्रधान सचिव(ग्रामविकास), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
५. प्रधान सचिव (ला.क्षे.वि.), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

६. प्रधान सचिव (रोहयो व जलसंधारण), ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
७. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि उद्योग विकास महामंडळ, अंधेरी,मुंबई.
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ,अकोला.
९. जिल्हाधिकारी (सर्व)
१०.मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व जिल्हा परिषदा)
११.सर्व संचालक, कृषि आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.संचालक, महाराष्ट्र राज्य बीज प्रमाणीकरण यंत्रणा, अकोला
१३.सर्व विभागीय कृषि सहसंचालक
१४.जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी (सर्व)
१५.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
१६.सर्व कृषि विकास अधिकारी/सर्व उपविभागीय कृषि अधिकारी/सर्व तालुका कृषि अधिकारी/सर्व मंडळ कृषि अधिकारी
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपुर
१९.संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
२०.संचालक, लेखा व कोषागार, मुंबई
२१.मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी.
२२.उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/ अमरावती/ नागपुर
२३.उप संचालक, लेखा व कोषागारे कोकण/नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपुर
२४.सर्व कार्यासने व पर्यवेक्षिय अधिकारी (कृषि) कृषि व पदुम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
२५.निवडनस्ती.